महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतनश्रेणी रुपये १५,६००-३९,१०० + ग्रेड पे रुपये ५,४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन आदेश, क्रमांकः मवैअ- २०१६/प्र.क्र. ८१२/सेवा-३
१० वा मजला, संकुल इमारत, गो.ते. रुग्णालय, संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ५ जानेवारी, २०१७.

शासन आदेश-

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रुपये १५,६००-३९,१०० + ग्रेड पे रुपये ५,४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांनी त्यांचे बदली संदर्भात केलेल्या विनंतीनुसार, त्यांची शैक्षणिक अर्हता, रुग्णसेवा इत्यादी बाबी विचारात घेऊन विहीत केलेले निकष व अनुषंगीक लोकहित तसेच प्रशासनाची निकड याबाबींचा विचार करुन खाली दर्शविलेल्या प्रमाणे त्यांच्या विनंती बदल्या करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | डॉ. व्ही. जी. पाटील | प्राथमिक आरोग्य केंद्र सावर्डे, जि. रत्नागिरी | उप जिल्हा रुग्णालय पेण, जि. रायगड |
| २ | डॉ. वैशाली संदिप ढगे | उप जिल्हा रुग्णालय हद्‌गांव,जि. नांदेड | जिल्हा रुग्णालय वाशिम |
| ३ | डॉ. बालाजी जनार्दन पाटील | प्राथमिक आरोग्य केंद्र गोळवण, जि. सिंधुदुर्ग | ग्रामीण रुग्णालय मालवण, जि. सिंधुदुर्ग |

१) बदली करण्यात आलेल्या वैद्यकीय अधिका-यांना त्यांच्या बदली झालेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता पर्यवेक्षकीय अधिका-यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे आणि संबंधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर होऊन, त्याबाबतचा रुजू अहवाल संबंधित उप संचालक, आरोग्य सेवा (परिमंडळ); आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई आणि शासनास सादर करावा.

२) बदली झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांची कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणा-या प्राधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

३) बदली झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांनी, त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नविन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. जे वैद्यकीय अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत गैरहजरी" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव सर्व संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

४) आरोग्य सेवा संचालनालयाने जे वैद्यकीय अधिकारी त्यांचे पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचे विरुध्द वेळीच कारवाई सुरु करावी. जेणेकरुन वैद्यकीय अधिकारी वेळीच नविन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होतील. सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक आठवडयाच्या आत संबंधीत अधिका-यांना कार्यमुक्त करण्याची जबाबदारी पर्यवेक्षकीय अधिकारी तथा उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळ) यांची राहील.

५) गडचिरोली जिल्ह्यातील बदल्या वगळता इतर जिल्हयातील बदली झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या जागी (बदली आदेशामध्ये विवक्षीतपणे नमूद केलेले वगळता ) दुसऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांची हजर होण्याची प्रतिक्षा न करता त्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. एक आठवडयाच्या आत कार्यमुक्त न केल्यास संबंधीत पर्यवेक्षकीय अधिकारी तथा उप संचालक, आरोग्य सेवा (परिमंडळ) यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन त्यांच्या विरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

६) बदली झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांचे कोणत्याही परिस्थितीत दिनांक १५.१.२०१७ नंतर त्यांच्या सध्याच्या पदस्थापनेवरुन वेतन व भत्ते काढण्यात येणार नाहीत, याची जबाबदारी सर्वथा संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

७) प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात आलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना नियमानुसार पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहील.

८) दिर्घकाळ अनधिकृतपणे गैरहजर असणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या जागी ज्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना पदास्थापना देण्यात आली आहे, त्यांना रुजू करुन घ्यावे व दिर्घकाळ अनधिकृत असणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल), १९७९ अंर्तगत कार्यवाही तात्काळ सुरु करावी. अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांचेबाबतीत त्यांचे प्रकरणपरत्वे स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

९) गडचिरोली जिल्ह्यातून बाहेर बदली करण्यात आलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना त्यांचे जागी नियमीत वैद्यकीय अधिकाऱ्यांची नियुक्ती / पदस्थापना झालेवरच संबंधीतांना कार्यमुक्त करण्यात यावे. याबाबत संबंधीत जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी यांनी दक्षता घेण्यात यावी.

१०) या बाबी विचारात घेऊन या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व संबंधित परिमंडळाचे उप संचालक, आरोग्य सेवा यांनी रिक्त पदाच्या अद्ययावत तपशीलासह अनुपालन अहवाल संचालक आरोग्य सेवा यांच्या मार्फत शासनास सादर करावा.

११) सदर आदेश महाराष्ट्र कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) आणि ४(५) च्या तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०६१४०३४५८२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2017.01.06 14:33:48 +05'30'

( वि. पुं. घोडके )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

संबंधित वैद्यकीय अधिकारी गट-अ (यांना संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांच्या मार्फत)

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र १ /२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२) आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई
३) संचालक आरोग्य सेवा, मुंबई.
४) उपसंचालक आरोग्य सेवा, सर्व परिमंडळे.
५) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.

६) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८) निवडनस्ती (सेवा-३)